कृषि उन्नती योजना - राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजना सन २०१९-२० मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जाती प्रवर्गासाठीचा केंद्र हिश्याचा रु. ८८.८३ लक्ष व राज्य हिश्याचा रु.५९.२२ लक्ष निधी वितरीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पूरक २०१९/प्र.क्र.१९८/३-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

**दिनांक : २० फेब्रुवारी, २०२०**

**वाचा -**

१) केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफनं.३६-२८/२०१७- अेई, विस्तार कक्ष, दि.३०.१०.२०१९ ची तीन पत्रे

२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१९/प्र.क्र.६६/३-अे , दि.१० जुलै, २०१९

३) संचालक आत्मा यांचे पत्र क्र.आत्मा/लेखा/ प्र.क्र.१०५/SCP/रा.ही.त/९२५/१९, दि.१४.११.२०१९

**प्रस्तावना -**

सन २०१९-२० मध्ये केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना- राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना आत्मा योजना राबविण्यासाठी संदर्भाधीन दि.१० जुलै,२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सन२०१९-२० मध्ये केंद्र पुरस्कृत राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना राबविण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.३०.१०.२०१९ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिश्याचा अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु. २११.१७ लक्ष निधी वितरीत केला आहे. त्या समरुप राज्य हिश्याचा रु.१४०.१७ लक्ष निधी चालू वर्षी दुस-या हप्त्यात अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर कृषि आयुक्त कार्यालयास वितरीत करणे आवश्यक आहे. तथापि, सद्य:स्थितीत सन २०१९-२० मध्ये आत्मा योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाच्या राज्य हिश्यासाठी अर्थसंकल्पित रु. ५९.२२ लक्ष इतका निधी शिल्लक आहे. त्या प्रमाणात दुस-या हप्त्याचा केंद्र हिश्याचा ६० % निधी म्हणजेच रु.८८.८३ लक्ष निधी सद्य:स्थितीत वितरीत करता येणे शक्य आहे.

सबब आत्मा योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाचा दुस-या हप्त्याचा केंद्र हिश्याचा रु. ८८.८३ लक्ष निधी व राज्य हिश्याचा रु. ५९.२२ लक्ष निधी कृषि आयुक्त कार्यालयास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन घेतला आहे. त्यानुषंगाने,शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०१९-२० मध्ये केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजनेंतर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिश्याचा रु. ८८.८३ लक्ष (रुपये अठ्ठयाऐंशी लक्ष त्र्याऐंशी हजार फ़क्त) निधी मागणी क्रमांक डी-३,२४०१ पीक संवर्धन, ७८९-अनुसूचित जाती उपयोजना,(०१) (२६) , कृषि उन्नती योजना - कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य- उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६० %) (अनुसूचित जाती) (२४०१ अे४३२),३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली कृषि आयुक्त यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१९-२० मध्ये केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजनेंतर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी राज्य हिश्याचा रु.५९.२२ लक्ष ( रुपये एकोणसाठ लक्ष बावीस हजार फ़क्त ) निधी मागणी क्रमांक डी-३,२४०१ पीक संवर्धन,७८९ - अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (२५) ,कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य- उप अभियान ( केंद्र पुरस्कृत योजना) ( राज्य हिस्सा ४०%) ( अनुसूचित जमाती) ( २४०१ अे४२१),३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली कृषि आयुक्त यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सन २०१९-२० मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालयपुणे , | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

४. आत्मा कार्यक्रम सन २०१९-२० साठी अनुसूचित जाती या प्रवर्गासाठी वितरीत करण्यात आलेला निधीचा केवळ त्याच प्रवर्गासाठी वापर करण्यात यावा.

५. सदर योजनेंतर्गत सन २०१९-२० मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे ( Audited Utilizaton Certificates ) सत्वर सादर करावीत.

हे आदेश सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनौपाचारिक संदर्भ क्र.UOR २१/SJSA, दि.२७.०१.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेच्या अधिन राहून निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०२१७३८४००५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.03.03 12:52:24 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती** -

१) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) प्रधान सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य ),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय,पुणे
४) आयुक्त (समाजकल्याण), पुणे
५) संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय,पुणे
६) सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ ( मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून )
७) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
१०) संचालक वनामती, नागपूर
११) उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
१२) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१३) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१४) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६) कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८) महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१९) वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
२०) नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
२१) कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) निवड नस्ती (कार्यासन-३अे)